**राष्ट्रीय उच्चतर शिक्षा योजनेंतर्गत मार्गदर्शक तत्वात नमूद केल्याप्रमाणे राज्यात शिक्षणाची गुणवत्ता राखून त्यामध्ये सूसुत्रता आणण्यासाठी तसेच निरक्षण पद्धत सुलभ करण्यासाठी राज्यस्तरीय गुणवत्ता हमी सेल** (State Level Quality Assurance Cell) (SLQAC) **गठीत करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२३/ प्र.क्र.१०९/ विशि-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
४ था मजला, मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०९ जून, २०२३

वाचाः- शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. संकिर्ण २०१६/ (११७/१६) विशि-३, दिनांक १०/१०/२०१६

**प्रस्तावना**-

राज्यामध्ये प्राथमिक शिक्षणाचे सबलीकरण करण्यासाठी राबविण्यात आलेल्या सर्व शिक्षा अभियान व राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियानाच्या यशस्वीतेमुळे उच्च शिक्षणाची गुणवत्ता व पाया यांचे सबलीकरण करण्यासाठी एकछत्री योजना अभियान स्वरुपात राबविण्याकरीता केंद्र शासनामर्फत राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान (RUSA) ही योजना १२ व्या व १३ व्या पंचवार्षिक योजनांपासून राबविण्यात येत आहे. उच्चतर शिक्षणात गुणवत्ता, सर्वदूर संधी व समानता यावी यासाठी केंद्र शासनाच्या राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियानाची राज्यात अंमलबजावणी करण्यासाठी राज्य मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने राज्य प्रकल्प संचालनालयाची स्थापना करण्यात आली आहे. मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांनी राष्ट्रीय उच्चतर शिक्षा योजनेंतर्गत मार्गदर्शक तत्वात नमूद केल्याप्रमाणे प्रत्येक राज्यात शिक्षणाची गुणवत्ता राखून त्यामध्ये सुसुत्रता आणण्यासाठी तसेच निरक्षण पद्धत सुलभ करण्यासाठी संदर्भाधीन दिनांक १०.१०.२०१६ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय गुणवत्ता हमी सेल निर्माण करण्यात आला होता. आता, नविन शैक्षणिक धोरण-२०२० मध्येही शैक्षणिक गुणवत्तेला प्राधान्य देण्यात आले आहे. त्यानुसार, संदर्भाधीन शासन निर्णय अधिक्रमित करुन नव्याने राज्यस्तरीय गुणवत्ता हमी कक्ष स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय**

या शासन निर्णयान्वये संदर्भाधीन दिनांक १०.१०.२०१६ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन खालील नमूद केल्याप्रमाणे राज्यस्तरीय गुणवत्ता हमी सेल (State Level Quality Assurance Cell) (SLQAC) गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव/ पदनाम | पद |
|---|---|---|
| १. | प्रकल्प संचालक, राज्य प्रकल्प संचालनालय, रुसा | अध्यक्ष |
| २. | संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ३. | संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई | सदस्य |
| ४. | सहसचिव/ उपसचिव, (वि.शि.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५. | सहसचिव/ उपसचिव,(म.शि.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६. | सहसचिव/ उपसचिव,(तां.शि.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ७. | संचालक, IQAC, सर्व अकृषी विद्यापीठे | सदस्य |
| ८. | डॉ. विजय जोशी, माजी अधिष्ठाता, मुंबई विद्यापीठ, मुंबई | सदस्य |
| ९. | सहसंचालक, राज्य प्रकल्प संचालनालय, रुसा, मुंबई | सदस्य सचिव |

राज्यस्तरीय गुणवत्ता हमी कक्षाची कार्ये पुढीलप्रमाणे आहेत.

१. राज्यातील शैक्षणिक गुणवत्ता दर्जा वाढविण्याच्या अनुषंगाने महाविद्यालयांचे नॅक मुल्यांकनाचे मानांकन वाढविणे.

२. विद्यापीठ व संलग्नित महाविद्यालयांच्या शैक्षणिक लेखापरिक्षणाचा आढावा घेणे

३. विद्यापीठ व महाविद्यालय स्तरावरील अंतर्गत गुणवत्ता हमी कक्षाच्या कार्याचा आढावा घेणे

४. विद्यापीठ व महाविद्यालय स्तरावरील अंतर्गत गुणवत्ता हमी सेलला शैक्षणिक लेखा परिक्षणाची व क्षमता विकासाची प्रक्रीया सुरळीत करण्यासाठी मार्गदर्शन करणे.

५. राज्यातील मुल्यांकनाच्या प्रगतीचे संनियंत्रण करणे व त्याबाबतची प्रगती गतीमान करण्यासाठी उपाययोजना सुचविणे.

६. महाविद्यालयांना नॅक मुल्यांकन करुन घेणेसाठी येत असलेल्या अडचणींच्या अनुषंगाने मार्गदर्शन करणे.

७. शैक्षणिक गुणवत्ता वृद्धीसाठी अन्य उपाययोजना सुचविणे.

राज्यस्तरीय गुणवत्ता हमी सेलचे मूल्यांकन व गुणवत्ता वाढीसाठी या क्षेत्रात तज्ञ असलेल्या व्यक्ती/संस्थांना आमंत्रित करता येईल.

राज्यस्तरीय गुणवत्ता हमी कक्षाच्या अशासकीय सदस्यांनी सेलचे काम करण्यासाठी दिलेल्या सेवा आणि केलेला खर्च मानधन स्वरुपात राज्य प्रकल्प संचालनालय, राष्ट्रीय उच्चतर शिक्षा अभियान, महाराष्ट्र यांना प्राप्त होणा-या Preparatory Grants मधून देण्यात येईल..

राज्यस्तरीय गुणवत्ता हमी सेलचे काम जसजसे वाढेल त्यानुसार या क्षेत्रातील तज्ञांना समाविष्ट करण्याकरिता सेलची रचना अधिक विस्तारित करता येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६०९१६१०१२०८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by ASHOK S MANDE
Date: 2023.06.09 16:12:21 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल तथा विद्यापीठाचे कुलपती यांचे प्रधान सचिव, मुंबई
२. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
४. कुलगुरु, सर्व अकृषी विद्यापीठे
५. राज्य प्रकल्प संचालक, राज्य प्रकल्प संचालनालय, रुसा, मुंबई
६. कुलसचिव, सर्व अकृषि विद्यापीठे.
७. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. सर्व सह/उप सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. संचालक, IQAC, सर्व अकृषी विद्यापीठे
११. डॉ. विजय जोशी, माजी अधिष्ठाता, मुंबई विद्यापीठ, मुंबई
१२. राज्य प्रकल्प सहसंचालक, राज्य प्रकल्प संचालनालय, रुसा, मुंबई.
१३. निवड नस्ती (विशि-३) , उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.